## महाराष्ट्र शासन

महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्र.८९/२००१डिआरएस-२००१/प्रक्र.४१६ /का-२
नविन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १५.६.२००१

निर्णय- देवदासींच्या पुनर्वसनाकरिता महिला व बाल विकास विभागाकडून विविध योजना राबविण्यात येत आहेत. सदरील योजना राबविण्यासाठी शासनाने परिशिष्ट-१ मध्ये नमुद केलेल्या शासन निर्णयाद्वारे वेळोवेळी आदेश निर्गमित केले आहेत. सदर सर्व शासन निर्णय अधिक्रमीत करण्यात येत असून देवदासींच्या पुनर्वसनाच्या योजनांबाबत खालीलप्रमाणे एकत्रित आदेश देण्यात येत आहेत. हा शासन निर्णय निर्गमित होण्यापूवी सदर योजना राबविण्यासंदर्भात करण्यात आलेली कार्यवाही ही परिशिष्ट-१ मध्ये नमुद केलेल्या शासन निर्णयाद्वारे करण्यात आली आहे असे समजण्यात यावे.

**"या शासन निर्णयातील देवदासी पुनर्वसनाच्या सर्व योजनांच्या लाभासाठी खालील अटींची पूर्तता होणे आवश्यक राहील."**

(१) देवदासींच्या पुनर्वसनाच्या सर्व योजनांच्या लाभाकरिता "देवदासी" म्हणजे दैवत, प्रेषित, देव किंवा देवी अथवा धार्मिक संस्था यांना वाहण्यात आलेली कोणतीही महिला असे समजण्यात यावे. यामध्ये मुरळीचा समावेश राहील. जोगते, नपुसंक यांना देवदासी पुनर्वसन योजनांचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही.

(२) ज्या महिला/मुली सन १९९६ पूर्वीच देवदासी आहेत त्यांनाच देवदासी पुनर्वसन योजनांचा लाभ अनुज्ञेय राहील. दिनांक १ जानेवारी१९९६ नंतर देवदासी झालेल्या देवदासींना देवदासी पुनर्वसन योजनांचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही.

(३) या योजनांच्या लाभांकरीता देवदासी असल्याबाबतचे प्रमाणपत्र संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्यांमार्फत देण्यात यावे.

(४) देवदासींचे महाराष्ट्रातील वास्तव्य १५ वर्षापेक्षा कमी नसावे.

(५) देवदासींचे किंवा तिच्या कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न शासनाने आर्थिकदृष्टया मागासवर्गीयांसाठी ठरवून दिलेल्या उत्पन्नापेक्षा जास्त नसावे.

**वरील सर्व अटी पूर्ण करणाऱ्या देवदासींनाच खालील योजनांचा लाभ त्या त्या योजनेतील अटी व शर्तीनुसार अनुज्ञेय राहील.**

## योजना क्र.१:- देवदासी किंवा तिच्या मुलीच्या विवाहासाठी अनुदान :-

**(एक) योजनेचे स्वरुप-**

देवदासी किंवा तिच्या मुलीच्या विवाहासाठी खालील अटी व शर्तीच्या अधिनतेने रुपये १०,०००/- (रुपये दहा हजार फक्त) इतके विवाह अनुदान अनुज्ञेय राहील

(१) विवाहाचे वेळी वधुचे वय १८ वर्षापेक्षा कमी व वराचे वय २१ वर्षापेक्षा कमी नसावे. (वयाचा दाखला जोडावा)

(२) वधुचा व वराचा प्रथम विवाह असावा

(३) संबधित विवाह नोंदणी प्राधिकरणाकडे विवाहाची नोंदणी करण्यात यावी.

(४) लाभधारकास इतर कोठूनही आर्थिक मदत मिळालेली नसावी.

(५) रुपये १०,०००/- इतक्या अनुदानापैकी रुपये २०००/- पर्यंतची रक्कम विवाह सोहळयाच्या खर्चाकरिता अनुज्ञेय राहील व रु.८०००/- इतकी रक्कम नवदांपत्यांच्या संयुक्त खात्यात राष्ट्रीयकृत बँकेत जमा करण्यात यावी.

(दोन) अर्ज करण्याची व अनुदान मंजुरीची कार्यपध्दती

(१) संबधित लाभधारकाने विहीत नमुन्यातील अर्ज संबंधीत जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्याकडे सर्व कागदपत्रांसह विवाहापूर्वी एक महिना अगोदर सादर करावा किंवा विवाहानंतर ६० दिवसाच्या आतही अर्ज सादर करता येईल.

(२) संबंधीत जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्यांनी अर्जाची छाननी करुन आपल्या शिफारशीसह व निरीक्षण अहवालासह प्रस्ताव आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे, महिला व बाल विकास यांना सादर करावा

(३) आयुक्त, महिला व बाल विकास , महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी अनुदान मंजुर करावे व अनुदान वितरण संबंधीत महिला व बाल विकास अधिकाऱ्यांनी करावे.

(४) विवाहापूर्वी आलेल्या अर्जावर संबधित अधिकाऱ्यांनी तातडीने कार्यवाही करुन विवाहप्रसंगी अनुदानाचे वितरण करावे.

(५) विवाह अनुदानाकरीता परिविक्षा अधिकारी, जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी कार्यालय यांनी नववांपत्यांचा गृहचौकशी अहवाल सादर करावा.

(६) अर्जासोबत खालील दाखले जोडण्यात यावेत-

अ) देवदासी असल्याबाबतचा दाखला.
ब) जन्मतारखेचा दाखला.
क) महाराष्ट्रातील वास्तव्याचा दाखला
ड) विवाह नोंदणीचा दाखला.
इ) उत्पन्नाचा दाखला.

(चार) लेखाशिर्ष

या वरील खर्च प्रधानशिर्ष-२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण-१०३, महिला कल्याण, तीन-इतर योजना (९)(बी) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -देवदासींच्या पुनर्वसनाच्या योजना (२२३५ १३९९), मागणी क्र.एक्स-१ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व मंजूर तरतुदीतून भागवावा.

## योजना क्र-२ :- देवदासींना निर्वाह अनुदान :-

(एक) योजनेचे स्वरुप-

४० वर्षावरील देवदासींना दरमहा रुपये ३००/- (रुपये तीनशे फक्त) इतके निर्वाह अनुदान खालील अटींच्या अधिनतेने मंजुर करण्यात यावे.

(१) सदर अनुदान फक्त ४० वर्षावरील अविवाहीत देवदासींना (महिला) अनुज्ञेय राहील.

(२) अनुदान मंजुरीकरीता अर्जाचे नमुने, देवदासीचे प्रमाणपत्र, वयाचा दाखला, उत्पन्नाचा दाखला यासंदर्भात आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संबधित अधिकाऱ्यांना सविस्तर सूचना द्याव्यात.

(दोन ) देवदासी निर्वाह अनुदान

देवदासी निर्वाह अनुदानाचे सदर आदेश दि.१.७.९७ पासून अमलात येतील. त्यामुळे या आदेशापूर्वी ज्या देवदासींना संजय गांधी निराधार अनुदान योजनेखाली अनुदान मिळत होते, त्यांचे त्या योजनेखालील अनुदान दि.१.७.९७ पासून बंद करावे व या योजनेखाली अनुदान चालू करावे. उर्वरित देवदासींना त्यांची प्रकरणे ज्या महिन्यांत मंजूर होतील त्या महिन्यापासून त्यांचे अनुदान चालू करण्यात यावे.

(तीन) अर्ज करण्याची व अनुदान मंजुरीची कार्यपध्दती

(१) संबंधित लाभधारकाने विहीत नमुन्यातील अर्ज संबंधीत जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्याकडे सर्व कागदपत्रांसह सादर करावा.

(२) संबंधीत जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्यांनी अर्जाची छाननी करुन आपल्या शिफारशीसह व निरीक्षण अहवालासह प्रस्ताव आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे, महिला व बाल विकास यांना सादर करावा

(३) आयुक्त, महिला व बाल विकास , महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी अनुदान मंजुर करावे व अनुदान वितरण संबंधीत महिला व बाल विकास अधिकाऱ्यांनी करावे.

**(चार) लेखाशिर्ष**

या वरील खर्च प्रधानशिर्ष-२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण-१०३, महिला कल्याण, तीन-इतर योजना (१७) -देवदासींना निर्वाह अनुदान (२२३५ २५०१), मागणी क्र.एक्स-१ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व मंजुर तरतुदीतून भागवावा.

## योजना क्र.३:- देवदासींच्या मुला-मुलींना गणवेश व शालेय साहित्यासाठी अनुदान :-

**(एक) योजनेचे स्वरुप**

देवदासींच्या १ ली ते १० वी पर्यंतच्या मुला-मुलींना शिक्षणासाठी मदत होण्यासाठी खालीलप्रमाणे अनुदान देण्यात यावे

| | | |
|---|---|---|
| (१) क्रमिक पुस्तके | प्रतिविद्यार्थी | रु. ७५/- |
| (२) वह्या | प्रतिविद्यार्थी | रु ७०/- |
| (३) इतर शालेय साहित्य | प्रतिविद्यार्थी | रु. ५०/- |
| (४) गणवेश (मुलांसाठी) | प्रतिविद्यार्थी | रु. १७५/- |
| (५) गणवेश (मुलींसाठी) | प्रतिविद्यार्थी | रु. २०५/- |

**(दोन) या अनुदानासाठी अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील.**

(१) सदर अनुदान वर्षातून एकदाच अनुज्ञेय राहील

(२) सदर अनुदान जिल्हा परिषदांच्या शाळा, महानगरपालिकांच्या शाळा तसेच मान्यताप्राप्त खाजगी शिक्षण संस्थांच्या शाळांमधील मुला-मुलींकरिताच अनुज्ञेय राहील.

(३) विद्यार्थी कोणत्या शाळेत कोणत्या इयत्तेत शिकत आहे याबाबत मुख्याध्यापकाचे प्रमाणपत्र आवश्यक राहील.

**(तीन) अर्ज करण्याची व अनुदान मंजुरीची कार्यपध्दती**

(१) संबंधित लाभधारकाने विहीत नमुन्यातील अर्ज संबंधीत जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्याकडे सर्व कागदपत्रांसह सादर करावा.

(२) संबंधीत जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्यांनी अर्जाची छाननी करुन आपल्या शिफारशीसह व निरीक्षण अहवालासह प्रस्ताव आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे, महिला व बाल विकास यांना सादर करावा

(३) आयुक्त, महिला व बाल विकास , महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी अनुदान मंजुर करावे व अनुदान वितरण संबंधीत महिला व बाल विकास अधिकाऱ्यांनी करावे.

**(चार) लेखाशिर्ष**

या वरील खर्च प्रधानशिर्ष-२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण-१०३, महिला कल्याण, तीन-इतर योजना (१)(बी) पंचवार्षिक योजनातर्गत योजना -देवदासींच्या पुनर्वसनाच्या योजना (२२३५ १३११), मागणी क्र.एक्स-१ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व मंजुर तरतुदीतून भागवावा.

## योजना क्र.४ :- देवदासींसाठी बीज भांडवल योजना

**(एक) योजनेचे स्वरुप**

कृषि व संलग्न उद्योग, ग्रामोद्योग, कुटीरोद्योग, लघुउद्योग, सेवाभावी व्यवसाय अशा स्वरुपाचे उपक्रम राबविण्यासाठी देवदासींना खालील अटींच्या अधिनतेने राष्ट्रीयकृत बँकामार्फत रु.३५०००/- (रुपये पस्तीस हजार फक्त) पर्यंतचे कर्ज घेता येईल.

(१) बँकामार्फत कर्ज घेताना अर्जदारास भरावी लागणारी २५% रक्कम बीज भांडवल म्हणून शासनाकडून बँकेत भरण्यात यावी.

(२) शासनामार्फत बीज भांडवल म्हणून बँकेत भरलेल्या रकमेची परतफेड द.सा.द.शे.४% इतक्या दराने अर्जदाराने करणे आवश्यक आहे.

(३) अर्जदाराने बँकेच्या कर्जाची परतफेड बँकेचा प्रचलित व्याजदरानुसार करावी.

(४) अर्जदाराने प्रथम बँकेच्या कर्जाची परतफेड करावी व त्यानंतर शासनाच्या बीज भांडवलाची परतफेड बँकेने ठरविलेल्या हप्त्यानुसार करावी.

(५) अर्जदार देवदासीचे वय १८ वर्षापेक्षा कमी नसावे.

(६) कर्जाचा अर्ज बँकेने मंजुर केल्यानंतर कर्ज मंजुरीची सर्व प्रक्रीया बँकेने पूर्ण केल्यानंतरच शासनाचे बीज भांडवल बँकेत जमा करण्यात येईल.

(७) अर्जदार महाराष्ट्राचा अधिकृत रहिवासी असला पाहीजे.

**(दोन) अर्ज करण्याची कार्यपध्दती**

(१) या योजनेकरिता संबंधीत बँकाच्या कर्ज योजनेनुसार विहीत नमुन्यातील अर्ज संबंधीत देवदासीने जिल्हा महिला बाल विकास अधिकाऱ्यामार्फत बँकेत सादर करावा.

(२) बँकेने कर्ज मंजुरीची प्रक्रीया पूर्ण केल्यानंतर आयुक्तांच्या मान्यतेने बीज भांडवलाची रक्कम संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्या ने बँकेत जमा करावी.

**(तीन) लेखाशिर्ष**

या वरील खर्च प्रधानशिर्ष-६२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण यासाठी कर्जे, ०२ समाज कल्याण,८००-इतर कर्जे-(बी) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (१)देवदासींच्या पुनर्वसनासाठी योजना (६२३५ ०१०१), मागणी क्र.एक्स-१ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व मंजुर तरतुदीतून भागवावा.

## योजना क्र.५:- समाजप्रबोधनाचे कार्य करणाऱ्या स्वयंसेवी संस्थांना अनुदान

**(एक) योजनेचे स्वरुप**

देवदासी प्रथा नष्ट करण्यासाठी समाज प्रबोधनाचे कार्य प्रभाविपणे करणाऱ्या नोंदणीकृत स्वयंसेवी संस्थांना वर्षभराच्या कार्यक्रमांकरिता रु.१०,०००/- (रुपये दहा हजार फक्त) इतके प्रोत्साहनपर अनुदान देण्यात यावे.

**(दोन) या अनुदानासाठी अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील.**

(१) हे अनुदान वर्षातून एकदाच अनुज्ञेय राहील.

(२) देवदासी कल्याण अभ्यासगटाने देवदासीचे प्राबल्य असलेले दहा जिल्हे नमूद केले आहेत. या दहा जिल्हयातील प्रत्येकी ३ प्रमाणे एकूण ३० संस्थांना सदर अनुदान मंजुर करता येईल. (जिल्हे: कोल्हापूर, सांगली, सोलापूर, उस्मानाबाद, नांदेड, लातूर, सिंधुदुर्ग, रत्नागिरी, पुणे व मुंबई.)

(३) या योजनेखाली अनुदानासाठी अर्ज करण्यापूर्वी संस्थेने देवदासी प्रथा निर्मुलनासाठी किमान तीन वर्षे सातत्याने भरीव स्वरुपाचे कार्य केलेले असावे.

(४) सार्वजनिक विश्वस्त अधिनियम, १९५० किंवा भारतीय संस्था नोंदणी अधिनियम, १८६० खाली संस्थेची नोंदणी झालेली असावी.

(५) मंजुर अनुदान केवळ देवदासी प्रथा निर्मुलनासाठी प्रसार व प्रचार कार्यक्रमांसाठीच वापरण्यात यावे व खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र खर्चाच्या तपशीलासह संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्यांना द्यावे.

(६) एकदा मंजुर केलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र दिल्याशिवाय नवीन अनुदान मंजुर करण्यात येवू नये.

(७) या योजनेखाली अर्ज करण्यासाठी संस्था अर्जाच्या तारखेपूर्वी ३ वर्षे अगोदर नोंदणी झालेली असावी.

**(तीन) अर्ज करण्याची व अनुदान मंजुरीची कार्यपध्दती**

(१) संबधित लाभधारकाने विहीत नमुन्यातील अर्ज संबंधीत जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्याकडे सर्व कागदपत्रांसह सादर करावा.

(२) संबंधीत जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्यांनी अर्जाची छाननी करुन आपल्या शिफारशीसह व निरीक्षण अहवालासह प्रस्ताव आयुक्त, महिला व बाल विकास,महाराष्ट्र राज्य, पुणे याना सादर करावा

(३) आयुक्त, महिला व बाल विकास , महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी अनुदान मंजुर करावे व अनुदान वितरण संबंधीत महिला व बाल विकास अधिकाऱ्यांनी करावे.

**(चार) लेखाशिर्ष**

या वरील खर्च प्रधानशिर्ष-२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण-१०३, महिला कल्याण, तीन-इतर योजना (१)(बी) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -देवदासींच्या पुनर्वसनाच्या योजना (२२३५ १३९९), मागणी क्र.एक्स-१ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व मंजुर तरतुदीतून भागवावा.

## योजना क्र.६:- देवदासींच्या मुलां-मुलींकरीता वसतीगृह :-

### (एक) योजनेचे स्वरुप :

देवदासींच्या मुला-मुलींना शिक्षण घेण्यासाठी सुविधा उपलब्ध व्हावी म्हणून स्वयंसेवी संस्थांमार्फत वसतीगृह सुरु करण्यास खालील अटींच्या अधिनतेने मान्यता देण्यात यावी-

(१) सार्वजनिक विश्वस्थ अधिनियम, १९५० किंवा भारतीय संस्था नोंदणी अधिनियम, १८६० खाली संस्था नोंदणीकृत असावी.
(२) संस्थेची आर्थिक स्थिती मजबूत असावी.
(३) या वसतीगृहात देवदासींच्या मुला-मुलींव्यतिरीक्त अन्य प्रवर्गातील २०% मुला-मुलींना प्रवेश अनुज्ञेय राहील
(४) वसतीगृहातील मुला-मुलींना अन्न, वस्त्र, बिछाना, क्रमीक पुस्तके, वह्या, शैक्षणिक साहीत्य, गणवेश इ. संस्थेमार्फत पुरविण्यात यावेत
(५) महाराष्ट्र राज्यातील सर्व स्तरावरील फक्त शासन मान्यता प्राप्त शैक्षणिक संस्थांमध्ये शिकत असलेल्या मुलांना वसतीगृहात प्रवेश देण्यात यावा.
(६) देवदासींच्या अनौरस मुला-मुलींनाही या वसतीगृहात प्रवेश अनुज्ञेय राहील.
(७) वसतीगृहाची लाभधारक क्षमता ७५ राहील.

### (दोन) संस्थेला अनुदान

वसतीगृह चालविण्यासाठी स्वयंसेवी संस्थेला खालीलप्रमाणे अनुज्ञेय होणाऱ्या आवर्ती व अनावर्ती रकमेच्या ९०% इतकी रक्कम शासनाकडून अनुज्ञेय राहील व १०% संस्थेचा हिस्सा राहील.

(अ) आवर्ती अनुदान

(१) वसतीगृह चालविण्यासाठी स्वयंसेवी संस्थेला दरमहा दरडोई रु.४५०/- (रुपये चारशे पन्नास फक्त) इतके परिरक्षण अनुदान आणि औषधी व प्रसाधन साहीत्य व इमारत भाडे याकरीता दरमहा दरडोई रु.५०/- (रुपये पन्नास फक्त) इतके अनुदान अनुज्ञेय राहील.
(२) रु.४५०/- इतक्या परिरक्षण अनुदानामध्ये अन्न, वस्त्र, साबण, तेल,वीज,पाणी, टपाल खर्च, लेखनसामुग्री, पाठ्पुस्तके, व्यवसाय प्रशिक्षण, आरोग्य, मनोरंजन, कर्मचाऱ्यांचे वेतन, इत्यादीवरील सर्व खर्चाचा समावेश राहील आणि रुपये ५०/- इतक्या अनुदानातून औषधी व प्रसाधन साहीत्य आणि इमारत भाडे यावरील खर्चाचा समावेश राहील.

(ब) अनावर्ती अनुदान

(१) फर्निचर, साधनसामुग्री, व्यवसाय प्रशिक्षण विषयक साहीत्य, भांडी-कुंडी, खाटा, बिस्तरे अशा स्वरुपाच्या बाबीकरीता प्रत्येक मुलामागे जास्तीत जास्त रुपये ५००/-(रुपये पाचशे फक्त) इतके अनावर्ती अनुदान प्रत्यक्ष खर्चाच्या अधिनतेने फक्त एकदाच अनुज्ञेय राहील.
(२) संस्थेने वसतीगृह इमारत बांधल्यास, प्रत्येक मुलामागे जास्तीत जास्त रुपये ६०००/- (रुपये सहा हजार फक्त) इतके इमारत अनुदान प्रत्यक्ष खर्चाच्या अधिनतेने फक्त एकदाच अनुज्ञेय राहील.

(क) संस्थांना नियमित अनुदान मंजुरीचे अधिकार आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना राहतील. नवीन संस्थांच्या प्रस्तावांना मान्यता देण्याचे अधिकार शासनाकडे राहतील.

### (तीन) योजनेखाली मंजुर वसतीगृहे

या योजनेखाली ७५ मुलांची क्षमता असणाऱ्या खालील वसतीगृहांना मान्यता देण्यात आली आहे.

(१) देवदासी निराधार मुक्ती केंद्र संचलित देवदासी मुलांचे वसतीगृह, गडहिंग्लज, जि.कोल्हापूर.
(२) भगिनी निवेदिता प्रतिष्ठान संचलित देवदासी मुलींचे वसतीगृह, जत, जि.सांगली.

### (चार) लेखाशिर्ष

या वरील खर्च प्रधानशिर्ष-२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण-१०३, महिला कल्याण, तीन-इतर योजना (१)(ए) -देवदासींच्या पुनर्वसनाच्या योजना (२२३५ १०५३), मागणी क्र.एक्स-१ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व मंजुर तरतुदीतून भागवावा.

२. वरील सर्व योजनांबाबतचे विहीत नमुन्यातील अर्ज आयुक्त, महिला व बाल विकास ,महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तयार करुन ते मुद्रीत करुन घ्यावेत व सर्व संबधित अधिकाऱ्यांना पाठवावेत.

३. वरील सर्व योजनांच्या संदर्भात देवदासी असल्याबाबतचा दाखला नोंदणीकृत देवदासी संघटनांकडून घेण्यात यावा व अशा दाखल्याची पडताळणी संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी करुन सदर दाखला प्रमाणित करावा.

४. देवदासी पुनर्वसन योजनांचा लाभ ज्या देवदासी घेतील त्यांना देवदासी म्हणून पुन्हा वावरता येणार नाही.

५. देवदासी पुनर्वसनाच्या योजना देवदासी कल्याण अभ्यासगटाने त्यांच्या अहवालात नमुद केलेल्या देवदासींचे प्राबल्य असलेल्या १० जिल्हयात राबविण्यात याव्यात. यामध्ये कोल्हापूर, सांगली, सोलापूर, उस्मानाबाद, नांदेड, लातूर, सिंधुदुर्ग, पुणे, मुंबई व रत्नागिरी ऐवजी सातारा जिल्हयाचा समावेश राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( चंद्रसेन तुरकर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव.
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव.
मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव.
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे -१
सर्व विभागीय महिला व बाल विकास अधिकारी
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी
निवड नस्ती-का-२

## परिशिष्ठ-१

**शासन निर्णय, महिला व बाल विकास क्र. ८१/२००१/डीआरएस-२०००/प्रक्र.४१६/का-२, दि. १५.६.२००१चे परिशिष्ठ-१**

**देवदासी पुनर्वसन योजना कार्यान्वित करण्यासाठी काढण्यात आलेल्या शासन निर्णयांची यादी**

(१) शा.नि. स.क.सां.का.क्री.व प.वि.क्र.एसडब्ल्युआय१०८५/२९०७३/(१४९)/सीए-३, दि.८.४.८६

(२) शा.नि. स.क.सां.का.क्री.व प.वि.क्र.एसडब्ल्युआय१०८६/(१४८)/सीए-३, दि.१३.८.१९८६

(३) शा.नि. स.क.सां.का.क्री.व प.वि.क्र.एसडब्ल्युआय१०८६/२७०११/(१७०)/सीए-३, दि.२९ ऑगस्ट,१९८६

(४)शा.नि. स.क.सां.का.क्री.व प. वि.क्र.एसडब्ल्युआय१०८७/९०९५/(८१)/सुधार-३, दि.२१.८.१९८७

(५)शा.नि.म.व बा.क.वि.क्र.डीआरएस-१०९३/प्रक्र.३९६/का-२, दि.२९.८.१९९४

(६) शा.नि.म.व बा.क.वि.क्र.जेजेए-१०९४/प्रक्र.४०/का-३, दि.१५.१२.१९९४

(७)शा.नि.म.व बा.क.वि.क्र.डीआरएस-१०९७/प्रक्र.१०/का-२, दि.२.९.१९९७

(८) शा.नि.म.व बा.क.वि.क्र.डीआरएस-१०९५/प्रक्र.२१७/का-२, दि.१२.१.१९९८

(९) शा.नि.म.व बा.क.वि.क्र.डीआरएस-१०९७/प्रक्र.१०/का-२, दि.१४.१.१९९८

(१०) शासन शुध्दीपत्रक म.व बा.वि .वि.क्र.डीआरएस-१०९७/प्रक्र.१०/का-२, दि.२.२.१९९८

(११) शासन परिपत्रक म.व बा.वि .वि.क्र.डीआरएस-१०९७/प्रक्र.१०/का-२, दि.२९.१०.१९९८

(१२) शासन परिपत्रक म.व बा.क.वि.क्र.डीआरएस-१०९७/प्रक्र.१०/का-२, दि.२.१.१९९९

---